**कोकण रेल्वे प्रकल्प भूसंपादनासाठी निर्माण केलेल्या अस्थाई पदांना मुदतवाढ.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक :आरएलवाय ०२०३/३९३/प्र.क्र.२५/परि-५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : ८ जानेवारी, २००४

**वाचा :-** १) शासन निर्णय गृह विभाग, क्र.आरएलवाय ०२०३/३९३/सीआर-२५/परि-५, दि. १७ मे, २००३
२) आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांचे पत्र क्र. भूसं/कार्या-१/ब.२/३६५१/२००३, दि.१४.१०.२००३ व दि. १२.१२.२००३

**शासन निर्णय :-** कोकण रेल्वे प्रकल्पासाठी भूसंपादन करण्याकरीता शासन निर्णय, गृह विभाग क्र.आरएलवाय ११९०/३३५/एक/परि-७, दि.३१.१२.९० अन्वये सिंधुदुर्ग जिल्हयासाठी १३ पदे निर्माण करण्यात आली होती. त्यापैकी ३ अस्थाई पदांना दि.३१.१२.२००३ पर्यंत शासन निर्णय, गृह विभाग क्र. आरएलवाय ०२०३/३९३/सीआर-२५/परि-५, दि.६.११.२००३ नुसार मुदतवाढ दिलेली आहे. सिंधुदुर्ग जिल्हयातील भूसंपादन संदर्भात कामे शिल्लक असल्याने सदर ३ अस्थायी पदांना (१) सहायक लेखा अधिकारी, २) मंडळ अधिकारी, ३) लिपीक) दि.१.१.२००४ ते २९.२.२००४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर पदे सहा महिन्यापेक्षा जास्त कालावधीकरीता रिक्त नाहीत.

२. याबाबत होणारा खर्च "३००१ भारतीय रेल्वे धोरण निश्चीती संचालन संशोधन संकीर्ण संघटना" या लेखाशीर्षाखाली टाकण्यात यावा त्यानंतर जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांनी या कामी होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाचे मासिक विवरण कोकण रेल्वे कॉर्पोरेशनकडे पाठवावे व झालेल्या प्रत्यक्ष खर्चाची प्रतिपूर्ती करुन घ्यावी. कोकण रेल्वे कॉर्पोरेशनकडून मिळणाऱ्या रकमेचा भरणा खालील लेखाशिर्षाखाली करावा.

"१००१ भारतीय रेल्वे संकीर्ण जमा
०१ वाणिज्यिक मार्ग
८०० इतर जमा रकमा"

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर १२३५/२००३/व्यय-८, दि.२२.१२.२००३ नुसार त्यांचे सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(आ. बा. कमाळे)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई,
कंपनी सचिव, कोकण रेल्वे कॉर्पोरेशन लि., बेलापूर भवन, बेलापूर, नवी मुंबई,
जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग,
विशेष भूसंपादन अधिकारी, कोकण रेल्वे प्रकल्प, सिंधुदुर्ग,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र १, मुंबई,
वित्त विभाग, व्यय-८, अर्थसंकल्प-१७०, वित्तीय सुधारणा,